**देहरजी मध्यम प्रकल्प ता.- विक्रमगड, जि.-पालघर योजनेस द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**<u>महाराष्ट्र शासन</u>**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०२५/(प्र.क्र.२२/२५)/मध्यम प्रकल्प**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २५ फेब्रुवारी २०२५

**संदर्भ:-**
१. शासन निर्णय क्र.आरपीए- १०७७/ ११७८ /२३३८ / (म.प्र)/ (१) दि. ४/५/१९७९
२. कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे कोपाविम निर्णय क्र. को.पा.वि.म/ तां-६/२५९६ /०५ दि. २१/१०/२००५
३. शासन निर्णय क्र. १४६/(प्र.क्र.९३/२१)/मध्यम प्रकल्प, दि. १४/०९/२०२१
४. शासन निर्णय क्र. बैठक (प्रक्र २८७/१८)/मध्यम प्रकल्प दि. ११/०९/२०१९
५. कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र जा. क्र. को.पा.वि.म./तां-४/देहरजी द्वितीय सुप्रमा/ २११ दिनांक २०/०१/२०२५

**<u>प्रस्तावना</u> :-**

देहरजी मध्यम प्रकल्प या योजने अंतर्गत मौजे सुकसाळे, ता. विक्रमगड, जि. पालघर येथे देहरजी नदीवर ९५.६० दलघमी क्षमतेचे माती व संधानकातील संयुक्त धरण बांधणे प्रस्तावित आहे. सदर प्रकल्पाचा समावेश कोकण पाटबंधारे विकास महामंडळांतर्गत पश्चिम वाहिनी वैतरणा नदीच्या खोऱ्यात (WRF-५) होतो. सदर प्रकल्प पाणीपुरवठा प्रकल्प असून प्रकल्पांतर्गत वसई - विरार महानगरपालिकेस पिण्याच्या पाण्याचे लाभ देणे नियोजित आहे. सदर प्रकल्प संदर्भ क्रमांक ३ शासन निर्णय नुसार मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या अर्थ साहाय्यातून कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचेमार्फत राबविण्यात येणार आहे.

प्रकल्पातील ६९.४२ द.ल.घ.मी. पाणीसाठा वसई-विरार महानगरपालिकेकरिता पिण्याच्या पाण्यासाठी आरक्षित करण्यात आला असून उर्वरित पाणीसाठा २३.८० दलघमी राखीव **(Carry over)** ठेवण्यात आला आहे.

देहरजी मध्यम प्रकल्प ता.विक्रमगड जि. पालघर या प्रकल्पास संदर्भ क्रमांक १ नुसार सन १९७६-७७ चे दरसूचीवर आधारित रुपये ११.५२ कोटी इतक्या रक्कमेस मूळ प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. सदर मूळ प्रशासकीय मान्यता व्यपगत झाल्याने संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये सन २००३-०४ च्या दरसूचीवर आधारित रू. १५८.२५ कोटी इतक्या रकमेस नव्याने प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती. तदनंतर संदर्भ क्रमांक ४ च्या शासन निर्णयान्वये सन २०१८-१९ दरसूचीवर आधारित रु. १४४३.७२ कोटी इतक्या रकमेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली.

दरम्यानच्या काळात दरसूचीतील बदल व भाववाढ, व इतर बाबी, अपु-या तरतुदी, भूसंपादनातील वाढ व अनुषंगिक खर्चात झालेली वाढ इत्यादी कारणांमुळे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ झाल्यामुळे कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे, यांनी संदर्भ क्र.५ अन्वये सन २०२२-२३ च्या दरसुचीवर आधारीत रुपये २५९९.१५ कोटी किंमतीचा द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर केला होता.

या प्रकल्पाच्या द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता छाननी अहवाल प्रस्ताव नगर विकास, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने मा. मंत्रिमंडळासमोर दि. ११/०२/२०२५ रोजीच्या बैठकीत सादर केला असता त्यास मंत्रीमंळाची मान्यता प्राप्त झाली आहे.

मा. मंत्रिमंडळाने बांधकामाची सद्य:स्थिती, किंमत वाढीची कारणमीमांसा इ. बाबींचा परामर्श घेऊन देहरजी मध्यम प्रकल्प ता.विक्रमगड जि. पालघर या प्रकल्पास सन २०२२-२३ दरसूचीवर आधारित रुपये २५९९.१५ कोटी किंमतीच्या द्वितीय सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :-

शासनाच्या या निर्णयाव्दारे देहरजी मध्यम प्रकल्प ता.विक्रमगड जि. पालघर योजनेच्या सन २०२२-२३ दरसुचीवर आधारित रुपये २५९९.१५ कोटी (रुपये दोन हजार पाचशे नव्याण्णव कोटी पंधरा लक्ष फक्त) किंमतीच्या द्वितीय सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रुपये २४९०.०३ कोटी (रुपये दोन हजार चारशे नव्वद कोटी तीन लक्ष फक्त) मध्ये कामा प्रित्यर्थ, आस्थापना व अनुषंगिक खर्चासाठी रुपये १०९.१२ कोटी (रुपये एकशे नऊ कोटी बारा लक्ष फक्त) तरतूद आहे. उपशिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा सोबत जोडण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान केलेली द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवही मध्ये अनुक्रमांक ०१/२०२५ वर नोंदवण्यात आली आहे.

- **<u>सदर द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहुन देण्यात येत आहे.</u>**

१. सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय मान्यता तरतुदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे.

२. संदर्भिय शासन निर्णय क्र. ०४ अन्वये सदरील प्रकल्पावरील पूर्ण खर्च मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणा मार्फत करण्यात यावा. प्रकल्पामुळे शासनावर कोणताही आर्थिक भार येणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. अतिरिक्त बाब दरसूची, कलम ३८ अंतर्गत समाविष्ट केलेल्या अधिक्यास व निविदेवर अतिरिक्त दायित्व उद्भवल्यास त्यास मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाची मान्यता मिळाल्याशिवाय सदर प्रकल्पाच्या निविदेवर वाढीव दायीत्वाचे काम करण्यात येऊ नये व खर्च करण्यात येऊ नये. ही जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता व अधीक्षक अभियंता यांची राहील.

४. सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच काम पूर्ण करण्याची जवाबदारी महामंडळाची राहील.

५. प्रकल्पाची अंमलबजावणी करतांना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दती याची काटेकोर अंमलबजावणी करणे, आवश्यकतेनुसार राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे व त्रुटींची पूर्तता करणे याची सर्वस्वी जवाबदारी महामंडळाची राहील.

६. सदर प्रकल्पास पर्यावरण विभागाकडून पर्यावरण मान्यता आवश्यक नसल्याबाबत दृढीकरण करुन घेण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

७. वनजमीन अंतिम मान्यता पत्र दि. १९/०२/२०१६ मधील अटींची पूर्तता करण्यात यावी. वनजमीन हस्तांतरणाची प्रक्रिया प्राधान्याने करण्यात यावी.

८. पाणी साठ्याच्या आरक्षणाबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात यावी.

९. प्रकल्प पूर्णत्वास नेण्याच्या दृष्टीने भूसंपादन कार्यवाही प्राधन्याने करण्यात यावी.

१०. धरणाच्या वरील बाजूस देहरजी नदीवर ०३ को.प. बंधा-यास मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या मान्यतेचे अधीन राहून द्वितीय सुप्रमा मधे काम सामाविष्ट करण्यात आले असून त्यास मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाची सहमती घेण्यात यावी.

११. प्रकल्पांतर्गत प्रस्तावित ५ मे.वॅ. विद्युत निर्मिती बाबत धोरणात्मक निर्णय घेण्यात आल्यानंतर जलसंपदा विभागाचे शासन निर्णय दि. १५/०९/२००५ व State Hydel Policy नुसार कार्यवाही करण्यात यावी.

१२. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण व कोकण पाटबंधारे विकास महामंडळ यांच्यातील सामंजस्य करारातील कलम ४ मधे नमूद केलेनुसार प्रकल्पाची मंजूर प्रथम सुप्रमा नुसार रु. १४४३.७२ कोटी किंमतीपेक्षा होणा-या अतिरिक्त खर्चाच्या ५०% रक्क्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अदा करेल असे नमूद करण्यात आले आहे. तरी सद्यस्थितीत प्रकल्पाच्या मंजूर करण्यात आलेल्या रु. २५९९.१५ कोटी किंमतीस अनुसरून सामंजस्य करारातील कलम (४) मध्ये, "मंजूर प्रथम सुप्रमा रु. १४४३.७२ कोटी किंमतीपेक्षा होणा-या अतिरिक्त खर्चाची रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई (MMRDA) अदा करेल." असा बदल करण्यात यावा.

१३. प्रस्तावित अंतर्भूत अतिरिक्त बाब दरसूची अंतर्गत संधानकाच्या बाबींचे दर हे संधानक श्रेणीच्या संबंधित कामाच्या आवश्यकतेनुसार घेण्यात यावेत व या अतिरिक्त दायित्वास सक्षम स्तरावरून मान्यता घेण्यात यावी.

१४. सदर योजनेतील सर्व घटकांची संकल्पने सक्षम स्तरावरून मंजूर करून घेण्यात यावीत.

१५. सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च न करणेची जवाबदारी महामंडळाची राहील.

१६. पुनर्वसनाचे काम तातडीने हाती घ्यावे जेणेकरून प्रकल्प विहित वेळत पूर्ण करण्यात अडचण निर्माण होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी.

१७. प्रकल्पासाठी आवश्यक असलेले "भूसंपादन" करुन "पुनर्वसनाबाबत" प्राधान्याने कार्यवाही करणे आवश्यक आहे. सदर भूसंपादन करत असताना भविष्यात न्यायालयीन प्रकरणे निर्माण होणार नाहीत किंवा उद्भवणार नाहीत याबाबत योग्य ती खबरदारी घेणे आवश्यक आहे.

१८. पुढील ३ वर्षात सदर प्रकल्प पूर्ण करण्याचे प्रस्तावित असल्याने त्यानुसार आवश्यक निधी देण्याची जवाबदारी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई (MMRDA) यांची राहील.

१९. प्रकल्पासाठी आवश्यक वैधानिक व तांत्रिक मान्यता सक्षम स्तरावर घेण्यात याव्यात.

२०. सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. काही अनियमितता निदर्शनास आल्यास त्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांवर राहील.

२१. उपलब्ध निधीचे Thin Spreading टाळणेचे दृष्टीने प्रकल्प घटकांच्या बांधकामावरील गुंतवणुकीचा प्राधान्य क्रम निश्चित करून त्यानुसारच कामे करावीत.

२२. शासनाने आदेशित केल्यानुसार Technical Audit करण्यात यावे.

२३. प्रकल्प विहीत वेळेत पूर्ण होण्याच्या दृष्टीने Project Management Unit (PMU) व Dashboard चा अवलंब करावा.

२४. संदर्भिय शासन निर्णय क्रमांक ०४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या सर्व अटींचे पालन करण्यात यावे.

२५. सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

या प्रकल्पाच्या कामावर होणारा खर्च संदर्भिय शासन निर्णय क्र. ०४ मध्ये नमूद केल्यानुसार मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून प्राप्त होणा-या भांडवली अंशदानातून भागविण्यात यावा.

या प्रकल्पाच्या कामावर होणारा खर्च “Civil Deposit Contribution Work Capital Outlay By Mumbai Metropolitan Region Development Authority (MMRDA) contribution to Konkan Irrigation Development Corporation” या लेखा शिर्षाखाली टाकावा व त्या खालील मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नगर विकास विभाग, नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी निर्गमित दिनांकापासून करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०२२५१४३६४४९१२७ असा आहे.

सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.
महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सहपत्र :- उपशीर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा**

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2025.02.25 14:39:25 +05'30'

**( प्रविण कोल्हे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत, सहपत्रांसह :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव (नगर विकास), नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
९) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
१०) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१३) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
१४) मुख्य अभियंता (द.व प्र) व सह सचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई.
१६) उप सचिव (मो.प्र-१/मो.प्र-२/जसं/निवसं/सिंव्य/लाक्षेवि/लपा/जवि), यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८) अधीक्षक अभियंता, उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा,ठाणे.
१९) वित्त विभाग (व्यय-१२/अर्थ-०२/अर्थ-१०/व्यय-६ अ ), मंत्रालय, मुंबई.
२०) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई.
२१) मध्यम प्रकल्प कार्यासन संग्रहार्थ.

**उप शिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा**

देहरजी मध्यम प्रकल्प ता.- विक्रमगड, जि.-पालघर

**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०२५/(प्र.क्र.२२/२५)/मध्यम प्रकल्प**

**दिनांक :- २५ फेब्रुवारी २०२५ चे सहपत्र.**

**(किंमत रुपये कोटी)**

| अ. क्र. | उपशिर्ष | मंजूर प्रथम सुप्रमानुसार तरतूद | द्वितीय सुप्रमानुसार तरतूद | वाढ घट / (+/-) |
|---|---|---|---|---|
| **अ)** | **शिर्षकामे** | | | |
| | ए-प्राथमिक | ३.९ | ३.७७ | -०.१२३ |
| | ब-भूसंपादन | ४४५.०० | ५८४.०७ | १३९.०६ |
| | सी- कामे | ८६१.७२ | १८०४.०३ | ९४२.३१ |
| | डी- विमोचक | २३.१६ | ७६.६८ | ५३.२५ |
| | के-इमारत | ३.२९ | ३.४८ | ०.१८१ |
| | एम-वृक्षारोपण | ०.०६ | ०.१५ | ०.०६४ |
| | ओ-संकीर्ण | १.४३ | १.०६ | -०.३७ |
| | पी-देखभाल | २.०० | १४.१५ | १२.१५ |
| | क्यू- हत्यारे व संयंत्रे | ०.२८ | ०.२८ | ०.०० |
| | आर- दळणवळण | १.३८ | १.८७ | ०.४८५ |
| | **एकूण (अ)** | **१३४२.२२** | **२४८९.५३** | **११४७.२९** |
| **ब)** | **कालवे व वितरण व्यवस्था** | | | |
| | ए-प्राथमिक | ०.५ | ०.५ | ०.०० |
| | बी-भूसंपादन | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | डी- विमोचक | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | एफ- मोरी कामे | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | जी- पूल | ०.०० | ०.०० | ० |
| | एच- अतीवाही | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | के-एमारत | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | एल-मातीकामे | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | एम-वृक्षारोपण | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | ओ-संकीर्ण | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | पी-देखभाल | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | क्यू- हत्यारे व संयंत्रे | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | आर- दळणवळण | ०.०० | ०.०० | ०.०० |
| | अस्तरीकरण तरतूद | ०.०० | ०.०० | ० |
| | **एकूण (ब)** | **०.५०** | **०.५०** | **०.००** |
| | **एकुण कामाची किंमत (अ)+(ब)** | **१३४२.७२** | **२४९०.०३** | **११४७.२९** |
| | **अनुषंगिक खर्च** | १०१ | १०९.१२ | ८.१३ |
| | **एकुण प्रकल्पिय किंमत** | **१४४३.७२** | **२५९९.१५** | **११५५.४२** |

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2025.02.25 14:39:52 +05'30'

**(प्रविण कोल्हे)**
**शासनाचे उप सचिव**